**<u>मागणी क्रमांक झेड एच-५, लेखाशिर्ष ४७०२ ए ०१९.</u>**
**खाजगी वाटाघाटीद्वारे थेट सरळ खरेदी पद्वतीने जमिन खरेदी करण्यासाठी निधी उपलब्ध करणेबाबत.**
**(भूसंपादन निधी)**

**महाराष्ट्र शासन**
**मृद व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : भूसंपा-२०१९/प्र.क्र.१८४/जल-०४**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: २५ फेब्रुवारी, २०२५.

**<u>वाचा:</u>** १) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. संकिर्ण-०३/२०१५/प्र.क्र. ३४/अ-२, दिनांक १२ मे, २०१५ व ३० सप्टेंबर, २०१५.
२) अपर आयुक्त तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण प्रादेशिक क्षेत्र, पुणे यांचे पत्र क्र. आस्था-३/ ४७८२/२०१९, दिनांक २७/०९/२०१८.
३) शासन समक्रमांक दिनांक २०/१२/२०१९ चा शासन निर्णय.
४) वित्त विभाग परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/ प्र.क्र. ८०/अर्थ ३, दिनांक २५/०७/२०२४.
५) प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग पुणे, यांचे पत्र क्र. लेशा / १३०, दिनांक १३/०१/२०२५.

<u>प्रस्तावना</u>:

पाझर तलाव उमराणी गट नं. ४९८, ४९९ व ५००, ता. जत, जि. सांगली या योजनेकरिता संपादित केलेली जमीन खाजगी वाटाघाटीद्वारे थेट सरळ खरेदी पध्दतीने खरेदी करण्यासाठी महसूल व वन विभागाच्या संदर्भिय शासन निर्णयानुसार जिल्हाधिकाकरी, सांगली यांच्या अध्यक्षतेखालील समितीने दिनांक ०६/०४/२०१७ रोजीच्या बैठकीमध्ये दर निश्चिती करुन मूल्यांकन केले आहे. त्यानुषंगाने सदरची जमीन खाजगी वाटाघाटीद्वारे थेट खरेदी करण्यासाठी शिफारस करण्यात आलेल्या संदर्भिय क्र. २ च्या प्रस्तावावर यापुर्वी संदर्भिय क्र. ३ च्या शासन निर्णयान्वये निधी उपलब्ध करुन देण्यात आला होता. मात्र कोव्हीड-१९ च्या जागतीक महामारीमुळे शेतकऱ्यांकडून कागदपत्रांची पुर्तता न झाल्याने गट क्र. ४९८ व ५०० मधील संपादित जमीनीसंदर्भातील प्रक्रिया पुर्ण झालेली नाही. त्यामुळे सदर गटासाठी उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी शासनास समर्पित करुन पुनःश्च निधी मागणी करण्यात आली आहे. त्यानुषंगाने सदरची जमीन खाजगी वाटाघाटीद्वारे थेट खरेदी करण्यासाठी शिफारस करण्यात आलेल्या संदर्भिय क्र. ५ च्या प्रस्तावावर वित्त विभागाच्या संदर्भिय परिपत्रकांमधील सूचना विचारात घेवून खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

<u>शासन निर्णय</u> : **पाझर तलाव उमराणी गट नं. ४९८, ४९९ व ५००, ता. जत, जि. सांगली या योजनेकरिता संपादित केलेली जमिन खाजगी वाटाघाटीद्वारे थेट सरळ खरेदी पध्दतीने खरेदी करण्यासाठीच्या मागणी विवरणपत्रानुसार एकूण रुपये २१.२१ लक्ष (अक्षरी रुपये एकवीस लक्ष एकवीस हजार फक्त) निधी खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून वितरित करण्यात येत आहे.**

**अ)** या प्रकरणी महसूल व वन विभागाच्या दिनांक १२ मे,२०१५ व ३० सप्टेंबर, २०१५ च्या शासन निर्णयानुसार तसेच अशा प्रकरणी शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेले परिपत्रक / शासन निर्णयान्वये दिलेल्या निदेशानुसार कार्यवाही करावी.

**ब)** या प्रकरणातील थेट खरेदी पध्दतीने जमीन खरेदी करण्याची कार्यवाही विहीत नियमानुसार तात्काळ करण्यात यावी. सदर खरेदी प्रक्रियेची संपूर्ण जबाबदारी संबंधित जिल्हा जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, सांगली यांची राहील. त्यांनी याबाबतचा अहवाल विहित मार्गाने शासनास सादर करावा.

**क)** या प्रकल्पाच्या भूसंपादनाकरिता अन्य स्त्रोतांकडून निधी उपलब्ध झाला असल्यास याद्वारे वितरित करण्यात येत असलेल्या रक्कमांचे आहरण अथवा वितरण करण्यात येवू नये.

**ड)** तसेच भूसंपादन प्रयोजनार्थ वरिलप्रमाणे उपलब्ध करुन देण्यात येत असलेल्या निधीची गरज नसल्यास, हा निधी कोणत्याही परिस्थितीत परस्पर अन्य प्रयोजनार्थ वितरित करण्यात येवू नये, सदर निधी तातडीने शासनाकडे प्रत्यार्पीत करावा.

**इ)** कोणत्याही लाभार्थ्यास दुहेरी फायदा होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

३. याद्वारे वितरित करण्यात आलेली रक्कम संबधित प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, पुणे यांनी आहरित करुन त्यांचे अधिनस्त संबंधित जिल्हा जलसंधारण अधिकाऱ्यांकडे त्वरेने वितरित करावी. त्यानुषंगाने होणारा खर्च पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा:-

मागणी क्रमांक झेड एच-५,
४७०२- लहान पाटबंधारे यावरील भांडवली खर्च,
(००), (१०१), भूपृष्ठ जल
(०१) लहान पाटबंधारे,
(०१) (०१) लहान पाटबंधारे योजना, ० ते १०० हे.सि. क्षमता (कार्यक्रम) (४७०२ ए०१९),
५३, मोठी बांधकामे

४. वरील खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे महालेखाकार कार्यालयास सादर करुन त्याच्या प्रतिस्वाक्षरीत प्रती अपर आयुक्त तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण प्रादेशिक क्षेत्र पुणे, आणि शासनाला उपलब्ध करुन देण्यात याव्यात.

५. याद्वारे वितरित निधीचा ताळमेळ ठेवण्याची जबाबदारी संबंधित प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, पुणे यांची राहील व अपर आयुक्त तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण प्रादेशिक क्षेत्र पुणे हे सदर बाबींचे समन्वयक प्राधिकारी राहतील.

६. प्रस्तुत आदेश, वित्त विभागाच्या संदर्भिय परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तींनुसार निर्गमित करण्यात येत असून महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावनर उपलब्ध करण्यात आलेल्या या आदेशाचा संकेतांक क्र. २०२५०२२५१७३२०५७२२६ असा आहे. हे आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार वा नांवाने.**

RAJESH HEMCHAND BAGDE

Digitally signed by RAJESH HEMCHAND BAGDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOIL AND WATER CONSERVATION DEPARTMENT, 2.5.4.20=ed7af9a8be3d880eda8e29b769ac16864ea0732c103c7f011129ff654701c22c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B7A690C5B955786C61B12D2A97A09E71E030D081D0786B3D4740E1A0078F4684, cn=RAJESH HEMCHAND BAGDE
Date: 2025.02.25 17:33:56 +05'30'

**( रा. हे. बागडे )**
**महाराष्ट्र शासनाचे अवर सचिव**

**प्रति,**

१) जिल्हाधिकारी, सांगली.
२) अपर आयुक्त तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण प्रादेशिक क्षेत्र, पुणे
३) प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, पुणे.
४) उप विभागीय अधिकारी, जत जि. सांगली.
५) जिल्हा जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, सांगली.
६) महालेखापाल (लेख व अनुज्ञेयता) / (लेखा परिक्षा), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.
७) जिल्हा कोषागार अधिकारी, सांगली.
८) कक्ष अधिकारी (जल-११), मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
९) निवड नस्ती, कार्यासन (जल-४)

**प्रत अग्रेषित,**

१) मा. विरोधी पक्ष नेता (विधान परिषद) विधानमंडळ, मुंबई यांचे खाजगी सचिव.
२) मा. मंत्री, मृद व जलसंधारण विभाग, यांचे खाजगी सचिव.
३) मा. राज्यमंत्री, मृद व जलसंधारण विभाग, यांचे खाजगी सचिव.
४) स्थानिक लोकप्रतिनिधी (मार्फत संबंधीत लघु सिंचन (जलसंधारण) उपविभागीय अभियंता)
५) सचिव, मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई. (यांचे स्वीय सहायक)
६) आयुक्त, मृद व जलसंधारण विभाग, महाराष्ट्र राज्य, छत्रपती संभाजीनगर.